**नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित आपदग्रस्तांना तातडीने मदत देण्याबाबतचे निर्णय घेण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या मंत्रीमंडळ उपसमितीची पुनर्रचना करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टंचाई -२०१४/प्र.क्र.२३३/म-७**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनंक:- २४ जून, २०२०

वाचा :-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, समक्रमांक, दिनांक २७.११.२०१४
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१२/प्र.क्र.१५७/म-३, दिनांक ३०.०१.२०१४
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१५/प्र.क्र.४०/म-३, दिनांक १३.०५.२०१५
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक : टंचाई-२०१४/प्र.क्र.२३३/म-७, दिनांक १३ जून, २०१८
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक : टंचाई-२०१४/प्र.क्र.२३३/म-७, दिनांक ५ डिसेंबर, २०१८

**प्रस्तावना -**

नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित होणा-या आपद्ग्रस्त व्यक्तींना द्यावयाच्या मदतीचे दर व निकष संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये सन २०१० ते सन २०१५ या कालावधीकरिता निश्चित करण्यात आले होते. केंद्र शासनाने नैसर्गिक आपत्तीमध्ये चक्रीवादळ, भूकंप, आग, पूर, त्सुनामी, गारपीट, दरड कोसळणे, बर्फखंड कोसळणे (हिमवर्षाव), टोळधाड, दुष्काळ, ढगफुटी व कडाक्याची थंडी, कीड हल्ला या आपत्तींचा समावेश केला आहे. सदर मदतीचे दर, राज्य शासनामार्फत अवेळी पाऊस, अतिवृष्टी (शेतीपिकांच्या नुकसानीसह सर्व नुकसान), आकस्मिक आग, समुद्राचे उधाण, वीज कोसळणे या आपत्तींकरिताही लागू करण्यात आले आहेत. या मदतीचे दर व निकष संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये सन २०१५ ते २०२० या कालावधीसाठी सुधारित करण्यात आले आहेत. नैसर्गिक आपत्तीच्या घटनांमुळे बाधित होणाऱ्या आपदग्रस्तांना तातडीने मदत देणे शक्य व्हावे यासाठी अशा प्रस्तावांवर निर्णय घेण्याकरिता कायमस्वरुपी मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्याचा प्रस्ताव मंत्रिमंडळास सादर करण्यात आला होता. या प्रस्तावासंदर्भात दिनांक २९.५.२०१८ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत झालेल्या निर्णयानुसार, कायमस्वरूपी मंत्रिमंडळ उपसमिती संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आली आहे. सदर मंत्रीमंडळ उपसमितीस संदर्भाधीन क्रमांक ५ वरील शासन निर्णयान्वये सन २०१८ च्या दुष्काळी कालावधीसह भविष्यात दुष्काळ उद्भवल्यास, त्या दुष्काळी कालावधीकरिता तातडीने उपाययोजना सुचविण्यासाठी/सनियंत्रण ठेवण्यासाठी/निर्णय घेण्यासाठी पूर्ण अधिकार देण्यात आले आहेत. मंत्रीमंडळाच्या दिनांक ६ मार्च, २०२० रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार, मा.मंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील विविध समित्यांची जेष्ठतेनुसार रचना करण्याबाबतचे निदेश प्राप्त झाल्याने सदर मंत्रीमंडळ उपसमितीची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: टंचाई-२०१४/प्र.क्र.२३३/म-७, दिनांक १३ जून, २०१८ अन्वये नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित आपदग्रस्तांना तातडीने मदत देण्याबाबतचे निर्णय घेण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या मंत्रीमंडळ उपसमितीची पुनर्रचना करण्यात येऊन खालीलप्रमाणे सुधारीत कायमस्वरूपी मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क. | सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १ | **मा.उपमुख्यमंत्री** | **अध्यक्ष** |
| २ | मा. मंत्री, ग्रामविकास | सदस्य |
| ३ | मा. मंत्री, मदत व पुनर्वसन | सदस्य |
| ४ | मा. मंत्री, कृषि | सदस्य |
| ५ | मा. मंत्री, सहकार | सदस्य |
| ६ | अपर मुख्य सचिव (वित्त) | सदस्य |
| ७ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (कृषि) | सदस्य |
| ८ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता) | सदस्य |
| ९ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (मदत व पुनर्वसन) | सदस्य सचिव |

उक्त मंत्रीमंडळ उपसमितीची कार्यकक्षा व दुष्काळी कालावधीकरिता आवश्यक उपाययोजना करण्याचे निर्णय घेण्याचे अधिकार संदर्भ क्रमांक ४ व ५ वरील शासन निर्णयात विहीत केल्याप्रमाणे राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६२४१४४३३८९३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2020.06.24 14:50:02 +05'30'

**( सु. ह. उमराणीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२) मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री,मदत व पुनर्वसन,मंत्रालय,मुंबई,
४) मा.मंत्री ,सहकार, मंत्रालय,मुंबई.
५) मा.मंत्री ,ग्रामविकास,मंत्रालय,मुंबई,
६) मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,

७) महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य,

८) अपर मुख्य सचिव (वित्त),मंत्रालय,मुंबई,

९) अपर मुख्य सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई,

१०) अपर मुख्य सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता),मंत्रालय,मुंबई,

११) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,मुंबई,

१२) सर्व विभागीय आयुक्त,

१३) सर्व जिल्हाधिकारी,

१४) महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,

१५) संचालक, लेखा व कोषागारे,मुंबई,

१६) मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई

१७) मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई

१८) मा.मंत्री (ग्रामविकास ), यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,

१९) वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई

२०) कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई

२१) वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई

२२) निवड नस्ती (कार्यासन/ म-७ ).